वित्त विभागाच्या अधिपत्याखालील विक्रीकर कार्यालयातील अधिकारी/ कर्मचारी यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण १०१४/प्र.क्र.१९८/वि.प्र.-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०००३२.
दिनांक : २७ मार्च, २०१५.

वाचा -

१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५.

२) सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : एसआरव्ही २०१४/व्हीआयपी २८४/ प्र.क्र.३६२/ १२, दिनांक २६/११/२०१४.

प्रस्तावना-

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्या विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी बदली अधिनियम, २००५ अंमलात आला आहे. या अधिनियमातील कलम ६ मधील दुसरे परंतुकातील तरतुदीनुसार वित्त विभागाच्या अधिपत्याखालील विक्रीकर कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे काही अधिकार प्रत्यार्पित करण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्या विनियमन करण्यासाठी आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध करण्यासाठी बदली अधिनियम, २००५ च्या कलम ६ मधील दुसरे परंतुकानुसार व कलम ७ नुसार वित्त विभागाच्या अधिपत्याखालील विक्रीकर कार्यालयातील अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्यात येत असून संबंधितांच्या बदल्यांचे अधिकार स्तंभ क्र.४ येथे नमूद केलेल्या मा.मंत्री महोदय/अधिकाऱ्यांना प्रदान करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकारी/कर्मचारी वर्ग | अधिनियमातील कलम ६ नुसार सक्षम प्राधिकारी | अधिकाराच्या प्रत्यायोजनानंतर बदली करण्यास सक्षम असलेले प्राधिकारी |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १. | अपर विक्रीकर आयुक्त, गट-अ (वेतनबँड रुपये ३७४००-६७००० अधिक ग्रेड वेतन रु.८८००) | मा.मंत्री (वित्त) यांच्यामार्फत मा.मुख्यमंत्री | मा.मंत्री (वित्त) |
| २. | विक्रीकर सह आयुक्त, गट-अ (वेतनबँड रुपये १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन रु.७६०० ) | | |

| | | | |
|---|---|---|---|
| ३. | विक्रीकर उप आयुक्त, गट-अ (वेतनबँड रुपये १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन रु.६६००) | मा.मंत्री (वित्त) | अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ४. | सहायक विक्रीकर आयुक्त, गट-अ (वेतनबँड रुपये १५६००-३९१०० अधिक ग्रेड वेतन रु.५४००) | मा.राज्यमंत्री (वित्त) यांच्यामार्फत मा.मंत्री (वित्त) | |
| ५. | विक्रीकर अधिकारी, गट-ब (वेतनबँड रूपये ९३००-३४८०० अधिक ग्रेड वेतन रु.४४००) | मा.राज्यमंत्री (वित्त) | विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई. |
| ६. | विक्रीकर निरिक्षक, गट-ब (अराजपत्रित) (वेतनबँड रूपये ९३००-३४८०० अधिक ग्रेड वेतन रु.४३००) | विनंती बदली मा.राज्यमंत्री (वित्त) यांच्या मार्फत मा.मंत्री (वित्त) | विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई. |
| ७. | गट-क मधील सर्व कर्मचारी (मुंबई क्षेत्रांतर्गत व महाराष्ट्रातील आंतरक्षेत्रिय बदल्या) | विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई. | |
| ८. | गट-क मधील सर्व कर्मचारी यांच्या (क्षेत्रांतर्गत बदल्या) | | संबंधीत क्षेत्रिय अपर विक्रीकर आयुक्त |
| ९. | गट-ड मधील सर्व कर्मचारी यांच्या क्षेत्रांतर्गत बदल्या | | |

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३२७११५९०८९९०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shankar Ganpati Satpute

Digitally signed by Shankar Ganpati Satpute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Joint Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shankar Ganpati Satpute
Date: 2015.05.06 12:28:30 +05'30'

(शं.ग.सातपुते)

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई.
२) मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव.
३) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक
४) अपर मुख्य सचिव (वित्त)/सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक
५) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई

६) विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई

७) सर्व संबंधीत अपर विक्रीकर आयुक्त (विशेष विक्रीकर आयुक्त यांचेमार्फत)

८) विक्रीकर प्रशासन -२, ३, ४.

९) निवडनस्ती